# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)

## चार पोथ्यांचा परिचय

संत महंत साहित्याचा भौगोलिक, ऐतिहासिक, समाजशास्त्राच्या अंगाने केलेले रसग्रहण













**संकलन: शशिकांत ओक**



# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)





## हभप हरिभाऊ निठूरकर पोथी

- ॐहभप हरिभाऊ निटूरकरांनी तेलुगुतून पोथीचे रुपांतर केले.
- ॐ त्यानंतर ती पोथी लोकप्रिय झाल्यावर अनेक नव्या प्रकाशकांनी भाषांतर केले.
- ॐत्यांच्या  व इतरांच्या पोथ्यांत काही मजकूरात कमी जास्त आहे.





# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)



ॐ श्रीपाद श्रीवल्लभ लीला वैभव”  पोथी परिचय –

ॐ श्री विठ्ठलबाबा यांना प्रवचनातून श्रीपाद श्रीवल्लभांच्या चरित्रातील अनेक घटनांची अनुभूती येत असे. त्या दिव्यानुभूतीच्या प्रभावातून बाहेर आल्यावर ते त्या अनुभवांचे उपस्थितांना तेलुगू मधून रसाळपणे वर्णन करत. शिष्या जयाभारती ते शब्द पटापट लिहून घेत. ते कथन नंतर ‘लीला वैभव’ पोथीतून प्रकाशित सन २००५ मधे झाले. मराठीत ते सन २०१४ मधे वाचकांच्या हाती आले.

ॐ श्री स्वामी विठ्ठलानंद सरस्वती महाराज (पूर्वाश्रमीचे विठ्ठलबाबा) साई आणि दत्त संप्रदायाचे अनुयायी होते. त्यांचाकडून दीक्षित माता निरंजनानंद सरस्वती (पूर्वाश्रमीच्या पोस्टमास्तर जयाभारती) सन १९८९ पासून संपर्कात आल्या. कृष्णा नदीच्या पात्रातील कुरवपुरबेट क्षेत्राच्या पंचदेव पहाडाच्या बाजूच्या किनाऱ्यावर सध्या श्रीक्षेत्र वल्लभापूर या आश्रम संस्थानाची स्थापना झाली. जुलै २०१४ मधे स्वामी विठ्ठलबाबांचे निजगमन झाले.












# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)







- ॐ मराठीत ह भ प हरिभाऊ निटुरकर प्रत निघाल्यानंतर गोपाळ बाबांच्या ट्रस्टच्या वतीने ते माफक किंमतीत उपलब्धब्दब्ध आहे. त्या पोथीमधे श्रींच्या पीठिकापुरातील वास्तव्याचे कथन प्रामुख्याने येते
- ॐ तर २४ अध्यायाच्या लीला वैभव पोथीतून अध्याय १२ पर्यंत श्रींचे पीठिकापुर गमन, बद्रिकावन, गोकर्ण महाबळेश्वर, श्रीशैल्य येथे वास्तव्य करून कुरवपुरातील स्थायिक झाल्यानंतर घटनांचे कथन येते. नंतर साधारणपणे अध्याय २२ पर्यंत तेथे संपर्कात आलेल्या व्यक्तींचे विशेषत्वाने कथन येते.
- ॐ अध्याय २३ मधे श्रींचे निजगमन आणि अध्याय २४ वल्लभेशाला वाचवायला ते पुन्हा प्रगट झाले याचे सुरस वर्णन येते. त्यानंतर अनुबंध प्रकरणात आत्ता पर्यंतच्या प्रखर शिष्यगणांचा संक्षिप्त आढावा आहे. दत्तपीठ  वल्लभापूर क्षेत्रातील अनेक प्रकल्पांचा परिचय करून दिला आहे.
- ॐ श्री विठ्ठलबाबांच्या प्रवचनातील वेचक विचारधन ज्ञानसागरातील मोती या मधून सादर केले आहे.



॥ श्री गुरुदेव दत्त ॥
श्री सरस्वती गंगाधर विरचित
सचित्र
॥ श्रीमद् गुरुचरित्र ॥
अध्याय-१ मंगलाचरण
दत्तजयंतीपर्यंत अवश्य जाणून घ्या मराठीतील अर्थ

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)

## चार पोथ्यांचा परिचय



- ॐ गुरुचरित्र – दत्तांचा दुसरा अवतार नरसिंह सरस्वती यांच्या चरित्रावर आधारित बावन्न अध्यायांचा (काही प्रतींत ५३) व सु. सात हजार ओव्यांचा हा ग्रंथ अनेक चमत्कार वर्णन करणारा असून त्यात तीर्थयात्रा, व्रतेवैकल्ये व आचारधर्म यांचे विवरण केलेले आहे. गुरुभक्तीवर विशेष भर दिलेला आहे.
- ॐ भाषा सरळ व सुबोध आहे. काव्यदृष्ट्या हा ग्रंथ विशेष सरस नसला, तरी ज्याची पारायणे आजही महाराष्ट्रात सर्वत्र केली जातात, पोथी लेखन प्रकाराची वैशिष्ठ्ये, योग्य घटनांची निवड व संक्षेपातील विवेचनआहे.
- ॐ निवेदनातील ओघ व प्रवाहीपणा, व्यक्तिदर्शनातील चातुर्य व प्रसंगवर्णनातील कसब, त्याचबरोबर नाट्यपूर्ण संवाद व विविध उपमादृष्टांतांची पेरणी यांमुळे मोरोपंतांची कविता, ही एकदा त्यांच्या संस्कृतप्रचुर भाषेचा तट ओलांडला, की रसिकाला मोहविणारी ठरते.





# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)




गोपाळबाबा पीठपुरम संस्थानद्वारे सुमती नंदन पब्लिकेशन ट्रस्टने माफक किमतीत पोथी प्रकाशित केली. ती मराठी , हिंदी, इंग्रजी व भाषेतून उपलब्ध आहे.



# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)




लीला वैभव पोथीतील कथानके व काही व्यक्तीविशेष

- ॐ आंजनेय शर्मा – मंदबुद्धी सात दिवस राहून आईच्या समोर मी जीव द्यायला निघालो म्हणून कृष्णेकाठी आईसह आला व श्रींनी रजका मार्फत बोलावल्यामुळे वाचला.. पंडित म्हणून प्रसिद्ध पावला. आईच्या कष्टांचे फळ म्हणून तिच्या पोटी पुढील अवतार घेईन म्हणून श्रींनी सांगितले.  घटना जिथे झाली ते वल्लभपुर म्हणून प्रसिद्ध आहे.
- ॐ हा आंजनेय शर्मा पुर्वजन्माचा कोण ज्ञानेश्वरांच्या काळातील त्यांची अवहेलना करणारा. विसोबा खेचर होता. या जन्मात आनंद शर्मा म्हणून अवहेलना व लोकांच्या चेष्टेचा व तुच्छतेचा विषय झाला. आंजनेयाचा विवाह करायला मामा आपल्या मुलीचे स्थळ घेऊन आला. आधी बहिणीच्या खडतर काळात तिला जवळ केले तर तिचे व मुलाचे झेंगट मागे लागेल असे वाटून तो कधी तिला भेटला नव्हता मात्र आता परिस्थिती बदलल्यावर मुलगी द्यायला आपणहून आला.
- ॐ आंजनेयाची आई पुर्वजन्माची कोण? तर सुमती  कथानकातील इंदुमती नामक वज्रबाहूंची जी दुष्ट राणी – होती तीच अंबिका झाली. एका सभेत आंजनेय शर्माचे पांडित्य पाहून एक वृद्ध म्हणाले, ‘मी तुझ्या वडिलांना ओळखत होतो. ते ही फार उच्च दर्जाचे पंडित होते’. या सभेत एकांनी शंका उपस्थित केली, ‘काहो असे एकाएकी मंदमती व्यक्तिला पंडित बनवता येऊ शकते? मग अगदी राम कृष्ण वगैरेंनी गुरुकुलात जाऊन शिक्षण घेतले ते उगीचच म्हणायचे! असे उभ्या उभ्या समोरच्याला विद्या संक्रमित केलेली कधी ऐकली नाही बुवा!...
- ॐ अहो ज्यांना पाण्यावर चालताना कमल पुष्पे येतात , व्याघ्राजीन उत्पन्न होते त्यांना अशी कृत्ये सहज होणारी आहेत... ते ऐकून शंकेखोर गप्प बसले.



# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)

## शिष्यगण




- ॐ रजक नावाडी – श्रींच्या दरबाराचे प्रांगण साफ धुणे, कपडे धुणे, भेटायला येणाऱ्यांना नावेतून जायची-यायची सोय करणे, नामजपाची माहिती सांगणे आदी घटलेल्या अदभूत कथा इतरांना सांगणे अशा कामाला त्याने वाहून घेतले होते.
- ॐ बदरी क्षेत्रातून आलेल्या सदानंद ब्रह्मचारी – काही साधू, योग्यांच्या सोबत आले.
- ॐ अ. १३.११७ श्री सांगतात कृष्णवेणी नदीचा प्रवास – सह्याद्री पर्वत श्रेणीत उगम, कुरवपुरानंतर श्रीशैल्य, पाताळगंगा, विजयवाटिका करत हंसल द्वीपाजवळ समुद्राला मिळते. कुठे बदरी बन कुठे कुरवपूर...
- ॐ तरीही श्रींच्या दर्शनाच्या ओढीने ते अनेकांना बरोबर घेऊन आले होते.



# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)

## पारायणासाठी प्रसिद्ध पोथ्या




ॐ खालील काही पोथ्या पारायणासाठी प्रसिद्ध आहेत.

ॐ नवनाथ भक्ति सार

ॐ साईलीला

ॐ गुरुचरित्र

ॐ श्री दत्तमहात्म्य

ॐ टेंभे स्वामी

ॐ दुर्गासप्त शती पाठ

ॐ गजानन विजय

ॐ श्री लक्ष्मी महात्म्य

ॐ दत्त बावनी-

ॐ रंगावधूत कृत























# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)




## पोथी वाङ्मयातील रंजक भाग

- ॐपोथी वाङ्मयातील हा भाग समजून घ्यायला रंजक वाटेल.
- ॐलीळाचरित्र सु. १२७८ मध्ये म्हाइंभट्टांनी (मृ.सु. १३००) महींद्र व्यास उर्फ म्हाइंभट्ट ह्यांनी संकलित केलेला लीळाचरित्र हा या पंथातील पहिला ग्रंथ होय. चक्रधरांच्या महानिर्वाणानंतर त्यांच्या आठवणी ऊर्फ लीळा लिहून काढण्याची प्रेरणा म्हाइंभट्टास झाली.
- ॐ'श्रीभक्तविजय' 'श्रीसंतलीलामृत' 'श्रीभक्तलीलामृत' कर्ते महिपतीबोवा – बोवांचा जन्म इ. स. १७१५ (शके १६३७) मधला. मोगलाईतील ताहराबाद हे त्यांचे जन्मस्थान. त्यांचे संपूर्ण नाव महिपती दादोपंत कांबळे. हे ऋग्वेदी वसिष्ठ गोत्री ब्राह्मण.
- ॐसुमारे चाळीस हजार ओव्या लिहुन 'संत चरित्रकार' कविवर्य महिपतिबोवा ताहराबादकर यांनी मराठी भाषेत खरोखरच एक अमोल कामगिरी केली आहे. त्यांचे 'श्रीभक्तविजय' 'श्रीसंतलीलामृत' 'श्रीभक्तलीलामृत' यासारखे रसाळ ग्रंथ मराठी भाषेचे अमोल लेणे ठरले आहेत. आपल्या काव्य गंगेने त्यांनी लक्षावधी मराठी वाचकांना खरोखरच पावन करून टाकले आहे! लिखाणातील प्रांजलपणा हा या सर्वाचाच जो विशेष गुण, तो यांच्या आत्मचरित्रांना विलक्षण सच्चेपणाची जोड देतो.



# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)

## विद्यारण्य




1374-1380 ते 1386 पर्यंत - परंपरेनुसार, वृद्धापकाळात त्यांनी विद्यारण्य हे नाव धारण केले आणि श्रृंगेरी येथील या मठाचे जगद्गुरू झाले.


हंपी विरूपाक्ष मंदिर समूह





श्रृंगेरी येथील मठ

ॐ विजयानगर राज्य शासन मध्वाचार्य, विद्यारण्य (अ ८ हरिहर आणि बुक्करायाचा साथीदार म्हणून विद्यारण्य महर्षींच्या नावाने विख्यात होशील, नंतरच्या दशकात तू तुझ्या सायणाचार्य भावाकडे तंजावूर राज्यातील महामंत्री होऊन उत्कर्ष होईल.)

ॐ माधवाचार्य (इ.स. १२६८ किंवा ११ एप्रिल, इ.स. १२९६ तुंगभद्राजवळचे एक खेडे, कर्नाटक हे विजयनगर साम्राज्याचे मंत्री असलेले प्रख्यात वेदभाष्यकार सायणाचार्य यांचे सुपुत्र होते. त्यांना सायण माधवाचार्य म्हंटले जाते.)

ॐ हरिहर "बुक्क यांनी स्थापन केलेल्या विजयनगरच्या सामाज्यात माधवाचार्य आणि सायणाचार्य हे दोन मंत्री होते, असे म्हणतात. "पंचदशी" कर्ते भारतीतीर्थ म्हणजेच विद्यारण्य असे समजले जाते.



# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)

## महिपती बुवांच्या ग्रंथाचे नाव, अध्याय, ओव्या. रचना शक, सन




| राम क्रमांक | ग्रंथाचे नाव | एकूण अध्याय | एकूण ओव्या | निर्मिती शक | निर्मिती इसवीसन |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीभक्तविजय | ५७ | ९९१६ | १६८४ | १७६२ |
| २ | श्रीकथासारामृत | १२ | ७२०० | १६८७ | १७६५ |
| ३ | श्रीसंतलीलामृत | ३५ | ५२५९ | १६८९ | १७६७ |
| ४ | श्रीभक्तलीलामृत | ५१ | १०७९४ | १६९६ | १७७४ |
| ५ | श्रीसंतविजय (अपूर्ण) | २६ | ४६२८ | १६९६ | १७७४ |

















# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ११)

## भाग ११ समाप्त..

चार पोथ्यांचा परिचय

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ
दिगंबरा ।श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये ।।